**राज्य युवा पुरस्कार योजना सुधारीत निकष निश्चित करण्यासाठी समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : रायुपु २०१८/प्र.क्र.१८/क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ०१ ऑगस्ट, २०१८.

वाचा:- १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. युकयो २०१२/प्र.क्र.६५/क्रीयुसे-३ दि. १२ नोव्हेंबर, २०१३.

**प्रस्तावना: -**

राज्याचे युवा धोरण २०१२ या अंतर्गत राज्यातील/जिल्हयातील युवांनी केलेल्या समाजहिताच्या कार्याचा गौरव व्हावा व युवा विकासाचे कार्य करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन मिळावे, यासाठी राज्य व जिल्हा स्तरावर युवा पुरस्कार प्रतिवर्षी देण्यास शासन निर्णय क्र. युकयो २०१२/प्र.क्र.६५/क्रीयुसे-३ दि. १२ नोव्हेंबर, २०१३ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सद्यस्थितीत युवा पुरस्कार निवडीचे निकष स्पष्ट नसल्यामुळे सन २०१६-१७ या वर्षीच्या पुरस्काराच्या वितरणास स्थगिती देण्यांत आली असून शिवछत्रपती पुरस्काराच्या धर्तीवर व युवा सामाजिक प्रतिष्ठा निर्देशांकानुसार, युवा पुरस्काराचा शासन निर्णय तयार करण्यासाठी एक समिती गठित करण्याची बाब या नस्तीवर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

युवा पुरस्कार निवडीचे सुधारीत निकष तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यांत येत आहे.

| अ.क्र | नांव | पद |
|---|---|---|
| १ | सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे | अध्यक्ष |
| २ | उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे | सदस्य सचिव |
| ३ | सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे | सदस्य |
| ४ | प्रा.डॉ.ना.ज.पवार, माजी कुलगुरु, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापिठ | अशासकीय सदस्य |
| ५ | विभागीय उपसंचालक, नेहरु युवा केंद्र, मुंबई | अशासकीय सदस्य |
| ६ | प्रा. अंबादास मोहिते, शिक्षण तज्ञ, अमरावती | अशासकीय सदस्य |
| ७ | राष्ट्रीय युवा पुरस्कार्थी (एकूण ३)<br>१) डॉ. मिलिंद भोई, पुणे<br>२) श्रीमती तपस्वी गोंधळी, रायगड<br>३) श्री. प्रविण निकम, पुणे | अशासकीय सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ८ | राज्य युवा पुरस्कार्थी (एकूण २)<br>१) श्री. विनित मालपूरे, नाशिक<br>२) श्रीमती श्वेता परुळेकर, कोल्हापूर | अशासकीय सदस्य |
| ९ | श्री. उदय जोशी, जिल्हा क्रीडा अधिकारी, अहमदनगर | सदस्य |
| १० | श्री. महादेव कसगावडे, जिल्हा क्रीडा अधिकारी, रायगड | सदस्य |

२. उपरोक्त सदस्यांचा कार्यकाल वर्षापुरता मर्यादित राहील. या समितीच्या सदस्यांना (शासन सेवेत नसल्यास) वित्त विभाग शासन निर्णय क्र. प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५ दि. ३० मार्च, २०१० मधील मुद्दा क्र. १२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे प्रवासभत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. त्यामुळे बैठकीसाठी वेगळयाने मानधन अनुज्ञेय रहाणार नाही. सदर उपसमितीवर होणारा खर्च मागणी क्र. ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ (०१) क्रीडा परिषद, (०१)(०१)महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषद (अनिवार्य) (२२०४ १५४२), ११ देशांतर्गत प्रवास खर्च, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील प्राप्त तरतुदीतून भागविण्यांत यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०२१६१३३८२८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.02 16:19:33 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४) सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
८) वरीष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे (संचालनालयामार्फत)
९) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, (संचालनालयामार्फत)
१०) सर्व जिल्हाधिकारी (संचालनालयामार्फत)
११) राज्य समन्वयक नेहरु युवा केंद्र (संचालनालयामार्फत)
१२) संबंधित अशासकीय सदस्य (संचालनालयामार्फत)
१३) निवडनस्ती, क्रीयुसे-३